**शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट- क मधील अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करणेबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१५/(०१/१५)/मशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय,मुंबई-३२
तारीखः २५.०५.२०१५

वाचा -

१) **शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही २०१४/प्र.क्र. २६/कार्या.१२, दि. १९.०१.२०१५**

प्रस्तावना -

संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये नागरी सेवा मंडळ स्थापन करण्यासाठी दि. २०.०५.२०१४ च्या शासन निर्णयाद्वारे दिलेली स्थगिती उठविण्यात आलेली आहे. यापुर्वी उच्च व तंत्र शिक्षण विभागातंर्गत उच्च शिक्षण संचालनालय, तंत्र शिक्षण संचालनालय, कला संचालनालय, ग्रंथालय संचालनालय व व्यवसाय शिक्षण संचालनालय या उपविभागांनी/संचालनालयांनी आपापली वेगवेगळी नागरी सेवा मंडळे स्थापन केलेली आहेत. ती सर्व मंडळे रद्द करुन नव्याने सर्व उपविभागांसाठी एकत्रित नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर निर्णय घेत असतांना सामान्य प्रशासन विभागाने शासन परिपत्रक दि. २६.१२.२०१४ व दि ०९.१२.२०१४ अन्वये शासकीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार दुय्यम अधिकाऱ्यांना प्रत्यार्पित करण्याबाबत दिलेल्या सूचना विचारात घेवून केलेल्या अधिसूचनेनुसार बदली करण्यासाठी सक्षम असलेल्या प्राधिकरणांना शिफारस करण्यासाठी नागरी सेवा मंडळे स्थापन करण्यासंदर्भात पुढे नमुद केल्यानुसार निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या नियंत्रणाखालील उच्च शिक्षण संचालनालय, तंत्र शिक्षण संचालनालय, कला संचालनालय, ग्रंथालय संचालनालय व व्यवसाय शिक्षण संचालनालय व त्यांच्या अधिनस्त विभागीय सहसंचालक कार्यालये, शासकीय महाविद्यालये व शासकीय संस्था यातील गट-अ, गट ब व गट क मधील अधिकाऱ्यांच्या/कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना व बदलीसंदर्भात यापुर्वी अस्तित्वात असलेले सर्व विदयमान शासन निर्णय अधिक्रमित करुन बदली करण्यासाठी सक्षम असलेल्या प्राधिकरणांना शिफारस करण्यासंदर्भात पुढीलप्रमाणे नागरी सेवा मंडळे स्थापन करण्यात येत आहेत .

| क्र. | स्तर | आस्थापना मंडळाचे सदस्य | कार्यकक्षा |
|---|---|---|---|
| १ | राज्य | प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण - अध्यक्ष<br>संचालक, उच्च शिक्षण-सदस्य<br>संचालक, तंत्र शिक्षण-सदस्य<br>संचालक, व्यवसाय शिक्षण (आस्थापना )-सदस्य<br>संचालक, ग्रंथालय-सदस्य | मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री व प्रधान सचिव बदली करण्यास सक्षम आहेत, अशी बदल्यांची प्रकरणे. |
| २ | संचालनालय | सहसचिव/उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण -सदस्य<br>संचालक, उच्च शिक्षण-सदस्य<br>संचालक, तंत्र शिक्षण-सदस्य<br>संचालक, व्यवसाय शिक्षण (आस्थापना )-सदस्य<br>संचालक, ग्रंथालय-सदस्य<br>(ज्या संचालनालयाच्या बदल्यांचा प्रस्ताव विचाराधीन असेल ते संचालक- अध्यक्ष) | संचालक बदली करण्यास सक्षम आहेत, अशी बदल्यांची प्रकरणे |
| ३ | विभागीय/ प्रादेशिक | अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण - सदस्य<br>सहसंचालक, उच्च शिक्षण-सदस्य<br>सहसंचालक, तंत्र शिक्षण-सदस्य<br>सहसंचालक, व्यवसाय शिक्षण -सदस्य<br>सहा.संचालक, ग्रंथालय-सदस्य<br>(ज्या सहसंचालनालयाच्या बदल्यांचा प्रस्ताव विचाराधीन असेल ते सहसंचालक- अध्यक्ष) | सहसंचालक बदली करण्यास सक्षम आहेत, अशी बदल्यांची प्रकरणे |
| ४ | जिल्हा | सहसंचालक, व्यवसाय शिक्षण -अध्यक्ष<br>अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण -सदस्य<br>जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी-सदस्य | जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी बदली करण्यास सक्षम आहेत, अशी बदल्यांची प्रकरणे. |

२.१ गट अ व गट-ब (राजपत्रित ) पदांवर पदोन्नती/सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्ग वाटप, सामान्य प्रशासन विभागाने (सेवा उपविभाग) अंतिम केल्यावर त्या यादीतील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेचा प्रस्ताव नागरी सेवा मंडळासमोर शिफारशीसाठी ठेवण्यात येईल.

२.२ बदल्यांबाबत शिफारशीसाठी प्रस्ताव नागरी सेवा मंडळासमोर ठेवताना, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार कार्यवाहीबाबत वस्तुस्थिती तसेच प्रस्तावित बदल्यांबाबतची पार्श्वभुमी/ वस्तुस्थिती, नागरी सेवा मंडळाच्या निदर्शनास आणण्यात येईल.

२.३ बदल्यासंबधीच्या प्रस्तावावर कार्यवाही करताना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहील .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२५१४०३१६९००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Niwrutti B Marale

Digitally signed by Niwrutti B Marale
DN: CN = Niwrutti B Marale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.25 15:31:45 +05'30'

**नि.भा.मराळे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
३. सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत:-**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
३. प्रधान सचिव, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
४. सहसचिव, (मशि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
५. सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती,मशि-१